लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४

**जि. चंद्रपूर येथील मतमोजणी केद्र व मतदानानंतर मोहोरबंद ईव्हीएम व व्हीव्हीपॅट ठेवण्याच्या सुरक्षा कक्ष (स्ट्रॉग रुम) दुरुस्तीच्या स्थापत्य कामांना प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग,**

**शासन ज्ञापन क्रमांक : सीईएल-२०२४/प्र.क्र.३८४/२४/३३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०४ एप्रिल, २०२४

**वाचा :-** १) जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, चंद्रपूर यांचे पत्र क्र.साशा/कार्या-१२/टे-३/लो.नि. /२०२४/२१७, दि.०१.०४.२०२४ चे पत्र.

२) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, चंद्रपूर याच्या दि.०१.०४.२०२४ च्या संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ करीता Maharashtra State Warehouse Corporation Godown, Warehouse Building in MIDC, Chandrapur Taluka & Dist. Chandrapur येथील स्ट्रॉग रुम व मतमोजणी केंद्राच्या परिसरातील प्रवेशद्वाराच्या दक्षिण - उत्तरेच्या रस्त्याच्या मध्यभागाच्या उत्तरेकडील उत्तर-पूर्व गोदाम क्र.११ व १२ तसेच उत्तर पश्चिमेकडील गोदाम क्र.१४ व १५ च्या गोदामातील दरवाजे व खिडक्या सिमेंट व विटानी बंद करणे, पायऱ्याचे बांधकाम व इतर दुरुस्तीबाबतचा स्थापत्य अभियांत्रिकी कामांचा एकूण रु.१९,६३,०००/- (रुपये एकोणीस लाख त्रेसष्ठ हजार फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकाचा प्रस्ताव या कार्यालयास प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावाच्या अंदाजपत्रकातील कामाचे विवरणपत्र पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | स्थापत्य अभियांत्रिकी कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय किंमत (रुपये) |
|---|---|---|
| १ | Making Temporary Arrangments for Strong Room and Counting hall for Loksabha Election purpose at Warehouse Building in MIDC, Chandrapur Taluka & Dist. Chandrapur. | १९,६३,०००/- |
| | **एकूण** | **१९,६३,०००/-** |

२. वरील तक्त्यात नमूद केल्यानुसार विषयांकित कामाच्या **रु.१९,६३,०००/- (रुपये एकोणीस लाख त्रेसष्ठ हजार फक्त)** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

(१) वरीलप्रमाणे करण्यात येणाऱ्या जि. चंद्रपूर येथील मतमोजणी केद्र व मतदानानंतर मोहोरबंद ईव्हीएम व व्हीव्हीपॅट ठेवण्याच्या सुरक्षा कक्ष (स्ट्रॉग रुम) ची दुरुस्तीच्या स्थापत्य कामांची दुरुस्ती कमीत कमी खर्चात व भारत निवडणूक आयोगाच्या मार्गदर्शक तत्वांप्रमाणे गुणवत्तापूर्ण होतील याबाबतची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील, त्याकरीता विहित कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

(२) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येणार नाही याद्दष्टीने दक्षता घेवून काम लवकरात लवकर पूर्ण करण्यात यावे.

(३) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

(४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

(५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

(६) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

(७) दुरुस्तीकरीता आवश्यक असलेल्या वस्तु भाडयाने घेण्यात याव्यात की खरेदी करण्यात याव्यात याबाबत तुलनात्मक विचार करुनच कार्यवाही करण्यात यावी. तसेच खरेदी करण्यात आलेल्या वस्तु पुढील निवडणुकीकरीता वापरु शकत असल्यास वापरण्यात याव्यात व नसल्यास सदर वस्तूंचे निर्लेखन करण्यात यावे. निर्लेखन करुन येणारी किंमत शासकीय लेख्यात जमा करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०४०४१५५४३६७५०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YOGESH
MAHADEO GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea5466761 4a049c47985d83, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E 85F3D06BECDD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2024.04.04 16:38:08 +05'30'

**( योगेश गोसावी )**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रति :-**

जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी ,चंद्रपूर

**प्रत -**

१. महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेय) नागपूर.
२. महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखापरिक्षा), नागपूर
३. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
४. मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, नागपूर विभाग
५. अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, चंद्रपूर
६. कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, चंद्रपूर
७. निवडनस्ती (सा.प्र.वि. कार्यासन ३३).